अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, चिपळूण, जिल्हा रत्नागिरी यांना "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - एमसीटी-०४२२/प्र.क्र.१११/परिवहन-५**
मादाम कामारोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७ जुलै, २०२३.

**वाचा :** १) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, रत्नागिरी यांचे पत्र क्र. म.जा.क्र.प्रशा.ब-४/४९९३/सन २०२२, दिनांक २२.०८.२०२२.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५

**प्रस्तावना :-**

शासन अधिसुचना, गृह विभाग क्रमांक एमसीटी-०८०५/१०६३/१३६/परिवहन-५, दिनांक २५ जुलै, २००६ अन्वये अपघाताच्या बाबतीतील नुकसान भरपाईसाठी ज्यामध्ये मोटार वाहनाच्या वापरामुळे व्यक्तींना मृत्यू किंवा शारिरीक इजा पोहचणे किंवा एखाद्या त्रयस्थ व्यक्तीच्या मालमत्तेस हानी पोहचणे किंवा दोन्हीही बाबतीतील दाव्यांवर अधिनिर्णय देण्याच्या प्रयोजनार्थ राज्यातील जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी त्या महसूली परिक्षेत्रासाठी दर्शविण्यात आलेल्या क्षेत्रासाठी मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे. तसेच राज्यातील जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी पदस्थापित केलेले जिल्हा न्यायाधीश, सह जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश व तदर्थ (ॲडहॉक) अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश, त्या दर्जाच्या अधिका-यांशी समतुल्य असलेले सदस्य त्या पदाचा भार वेळोवेळी ग्रहण केल्याचे समजण्यात येणारे जिल्हा न्यायाधीश, सह जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश व तदर्थ (ॲडहॉक) अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश यांना त्या महसूली परिक्षेत्रासाठी मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाची प्रकरणे हाताळण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. यानुषंगाने अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, चिपळूण, जिल्हा रत्नागिरी यांना "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग एक मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात

आलेल्या अधिकारानुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम,१९६८ मधील नियम १५ (३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करून अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, चिपळूण, जिल्हा रत्नागिरी यांना “कार्यालय प्रमुख” आणि “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०७०७१८२६१४०७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SIDDHARTH RAMBHAU KHARAT

Digitally signed by SIDDHARTH RAMBHAU KHARAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=22C1B7C1413E77554A8E64CBC60B74FB6471605C32ACF8B9B51B2B018FEFDC0B, cn=SIDDHARTH RAMBHAU KHARAT
Date: 2023.07.07 18:27:23 +05'30'

**( सिद्धार्थ खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रबंधक, मा.उच्च न्यायालय (अपिलेट शाखा), मुंबई. (पत्राने)
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, रत्नागिरी.
३) अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, चिपळूण, जिल्हा रत्नागिरी
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
६) उप कोषागार अधिकारी, चिपळूण, जिल्हा रत्नागिरी.
७) वित्त विभाग (विनियम/कोषा/व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती (परिवहन-५), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.